१३ वा वित्त आयोगांतर्गत जिल्हा नाविन्यपूर्ण योजनेचा निधी वितरित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वित्त आयोग-११/प्र.क्र. ४२/ का.१४८१-अ**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**तारीख: ०१ डिसेंबर,२०१४**

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांक : वित्त आयोग-११/प्र.क्र.४२/ का.१४८१-अ, दिनांक ४ डिसेंबर, २०१२

२) शासनाचे समक्रमांकाचे दि.१२/०२ /२०१३ चे पत्र.

३) शासन निर्णय क्र. वित्त आयोग-११/प्र.क्र.४२/का.१४८१-अ, दि. १०/०६/२०१३

४) शासनाचे समक्रमांकाचे दि. २९/०३/२०१४ चे पत्र.

५) शासनाचे समक्रमांकाचे दिनांक २९ **नोव्हेबर,२०१४ चे** पत्र.

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाच्या १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून राज्यातील प्रत्येक जिल्हयांना जिल्हा नाविन्यपूर्ण योजनेसाठी प्रतिवर्ष रु.२०.०० लक्ष प्रमाणे ५ वर्षाकरीता रु.१.०० कोटी निधी अपेक्षित आहे. अल्पशः भांडवली गुंतवणुकीच्या अभावामुळे जिल्हयात अस्तित्वात असलेल्या सार्वजनिक पायाभूत सुविधांचा परिपूर्ण वापर होत नसेल व सदर पायाभूत सुविधांचा परिपूर्ण वापर होण्याकरीता थोडी गुंतवणूकीची आवश्यकता असेल, अशा ठिकाणी सदर निधीची गुंतवणूक करता येईल, असे केंद्र शासनाने सदर निधी उपलब्ध करुन देताना निर्देशित केले आहे. स्थानिक पायाभूत सुविधांमधील तफावत भरुन काढण्यासाठी आणि विद्यमान निधीतून / स्त्रोतांद्वारे ज्या छोट्या कामांसाठी निधी मिळत नाही, त्यासाठी या निधीचा विनियोग करावयाचा आहे. अस्तित्वात असलेल्या भांडवली मालमत्तेचा पुरेपुर वापर होणेसाठी तफावत भरून त्यापासून त्वरीत लाभ मिळविणे हा या निधीचा प्रमुख उद्देश आहे.

१३ व्या वित्त आयोगांतर्गत जिल्हा नाविन्यपूर्ण योजना ही केंद्र पुरस्कृत योजना आहे. ९० टक्के शासनाचा सहभाग व १० टक्के हिस्सा लोक सहभाग /अशासकीय संस्था यांचेकडून घेणे आवश्यक आहे. यासंदर्भात मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तर सनियंत्रण समितीने मान्यता दिलेल्या प्रस्तावांची यादी उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक ५ येथील दिनांक **२९ नोव्हेबर,२०१४** च्या पत्रान्वये सर्व संबंधित जिल्हाधिकारी यांना पाठविण्यात आली आहे. सन २०१३-१४ मध्ये या योजनेसाठी केंद्र शासनाकडून राज्यास निधी प्राप्त झाला असून, सदर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

२. “१३ व्या वित्त आयोगांतर्गत जिल्हा नाविन्यपूर्ण योजना” या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी केद्रशासनाकडून राज्यास प्राप्त झालेल्या निधीतून ९० टक्के शासनाचा सहभाग असलेला निधी उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक ५ येथील दिनांक **२९ नोव्हेबर, २०१४** च्या पत्रान्वये मंजूर केलेल्या कामांसाठी

खालील विवरण पत्रात स्तंभ ४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे, **उपलब्ध निधीच्या प्रमाणात** जिल्हानिहाय वितरित करण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अनु. क्र. | जिल्हा | सन २०१३-१४ मध्ये अखर्चित /समर्पित निधी | दि. २९/११/२०१४ च्या पत्रान्वये मान्य योजनेचा निधी | निधी वितरण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ठाणे | २१.५७ | ० | २१.५७ |
| २ | रायगड | २५.४६ | १९.७४४ | ४५.२०४ |
| ३ | रत्नागीरी | ० | ३३.५५२ | ३३.५५२ |
| ४ | कोल्हापूर | १६.०८ | ३४.३४९ | ५०.४२९ |
| ५ | सांगली | २०.८८ | ६.८७० | २७.७५ |
| ६ | नाशिक | ० | ६१.५८८ | ६१.५८८ |
| ७ | अहमदनगर | ० | ४८.०८९ | ४८.०८९ |
| ८ | जळगाव | ० | ४४.५९९ | ४४.५९९ |
| ९ | धुळे | ७.८७ | ६३.८९० | ७१.७६ |
| १० | बीड | ० | ५६.३३३ | ५६.३३३ |
| ११ | परभणी | ० | ४८.०८९ | ४८.०८९ |
| १२ | हिंगोली | ० | ४८.०८९ | ४८.०८९ |
| १३ | जालना | ० | ६०.७९८ | ६०.७९८ |
| १४ | नांदेड | ० | ५१.९७१ | ५१.९७१ |
| १५ | वर्धा | २१.४३ | ० | २१.४३ |
| १६ | भंडारा | ० | ५६.५३९ | ५६.५३९ |
| १७ | चंद्रपूर | ० | ६८.२५२ | ६८.२५२ |
| १८ | गडचिरोली | २७.११ | १.३७४ | २८.४८४ |
| १९ | अमरावती | ० | ६.८७० | ६.८७ |
| २० | बुलढाणा | ० | २०.६१० | २०.६१ |
| २१ | वाशिम | ० | ५८.३९४ | ५८.३९४ |
| | **एकूण** | **१४०.४०** | **७९०.००** | **९३०.४०** |

३. संदर्भाधीन क्र. २ व ४ येथील पत्रान्वये मान्यता देण्यात आलेल्या प्रस्तावांतील ज्या योजनांचा निधी अखर्चित राहिला व जिल्ह्यांकडून मार्च, २०१४ अखेर **शासनास** समर्पित करण्यात आलेला आहे अशा योजनांचा रु.१.४०/- कोटी निधी (शासन हिस्सा ९० %) उपरोक्त विवरणपत्रातील स्तंभ ३ मध्ये नमूद जिल्ह्यांना खर्च करण्यास मान्यता देण्यात येवून वितरित करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी यांनी सन २०१३-१४ मध्ये मार्च, २०१४ अखेर निधी **शासनास** समर्पित करण्यात आल्याची खात्री करून निधी वितरित करावा.

४. शासनाचा सहभाग असलेला **९० % निधी उपलब्धतेप्रमाणे** वितरित करण्यापूर्वी १०% लोकसहभाग /अशासकीय संस्थांचा हिस्सा जिल्हाधिकारी यांचेकडील बँक खात्यात जमा करणे आवश्यक आहे. सदर निधी खर्च करताना १३ व्या वित्त आयोगांतर्गत मंजूर केलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच निधी खर्च करावा. मंजूर अनुदानापेक्षा जास्तीचे दायित्व निर्माण करू नये. १३व्या वित्त आयोगांतर्गत प्रत्यक्षपणे प्राप्त होणाऱ्या निधीच्या मर्यादेतच (१ कोटी)निधी खर्च करावा. तसेच, निधी खर्च करताना उपरोक्त नमूद दि. ४.१२.२०१२ च्या शासन निर्णयात व या शासन निर्णयात दिलेल्या सूचनांचे तंतोतंत पालन करूनच, निधी खर्च करावा. निधी विहित वेळेत खर्च न झाल्यास त्याची सर्व जबाबदारी अंतिमत: जिल्हाधिकारी यांची राहील.या कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणा-या कामांचा प्रगती अहवाल दरमहा १० तारखेपर्यंत कार्यान्वयीन यंत्रणांनी जिल्हाधिकारी यांना सादर करावा. जिल्हाधिकारी यांनी एकत्रित अहवाल दरमहा २० तारखेपूर्वी शासनास सादर करावा. तसेच निधीच्या खर्चाचे अंतिम उपयोगिता प्रमाणपत्र, आर्थिक / भौतिक अहवालही त्या अहवालासोबत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास पाठविण्यात यावा.

५. वितरीत केलेला निधी," मागणी क्र. ओ-१०, ४५१५- इतर ग्रामविकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च, १०२ सामुहिक विकास, (००)(४१) १३ व्या वित्त आयोगांतर्गत जिल्हा नाविन्यपूर्ण योजना (४५१५०८५२), ३१ सहाय्यक अनुदान(वेतनेतर) व ५३ मोठी बांधकामे " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१४-१५ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. सदर निधी वितरण हे वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४५/२०१४ वि.आ.क. दिनांक १४/११/२०१४ नुसार प्राप्त मान्यतेप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०११२३४१४९९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saware Anil V

Digitally signed by Saware Anil V
DN: c=IN, o=Goverment of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Saware Anil V
Date: 2014.12.01 17:08:29 +05'30'

**(अनिल वि. सावरे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
५) मा. कार्याध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, नवीन प्रशासकीस भवन, १८वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ३२,
६) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७) महालेखापाल १/२, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८) शासनाचे मुख्य सचिव,
९) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
१०) महासंचालक, यशदा, पुणे,
११) सदस्य सचिव, उर्वरित वैधानिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय भवन, १८वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ३२,
१२) सदस्य सचिव, मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय इमारत, तळमजला, औरंगाबाद,
१३) सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ, बी-२३/१, साऊथ अंबाजरी मार्ग, अंध विद्यालयाजवळ, नागपूर,
१४) आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, बाबा पेट्रोल पंपाजवळ, अदालत रोड, औरंगाबाद,
१५) विभागीय आयुक्त (सर्व),
१६) जिल्हाधिकारी (सर्व),
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),
१८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,
१९) जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व),
२०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
२१) कक्ष अधिकारी का.१४८१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२) निवड नस्ती, (का. १४८१-अ). नियोजन विभाग.